उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय महाविद्यालये/संस्थेमधील प्राध्यापक या पदाच्या सन २०१५ मधील बदल्यांबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बदली-२०१५ (२३०/१५)/मशि-१**
मंत्रालय विस्तार, मादाम कामा मार्ग
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
तारीख : २२/०७/२०१५.

# आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्य पार पडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४(५) मध्ये विहीत केलेली तरतूदीस अनुसरुन उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय महाविद्यालये/संस्थांमधील प्राध्यापक या संवर्गातील डॉ. श्रीरामवार विजया शंकरराव (संगावार), प्राध्यापक (भौतिकशास्त्र), शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती बदल्यांच्या अधिनियमातील कलम ३(१) मध्ये विहित केलेल्या कालावधीपेक्षा जास्त कालावधी शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती येथे व्यतीत केला असल्याने व शासकीय विज्ञान संस्था, नागपूर या संस्थेची गरज विचारात घेऊन डॉ. श्रीरामवार विजया शंकरराव (संगावार) यांची बदली शासकीय विज्ञान संस्था, नागपूर येथे प्रशासकीय कारणास्तव करण्यात येत आहे.

सदर बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी तात्काळ होण्याकरीता संचालक, शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती यांनी खालील सुचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

१. बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर डॉ. श्रीरामवार विजया शंकरराव (संगावार) यांना बदलीच्या ठिकाणी रूजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त व्हावे.
२. पदस्स्थापनेत बदल करण्यासंदर्भात कोणत्याही विनंतीची दखल घेण्यात येणार नाही. बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी डॉ. श्रीरामवार विजया शंकरराव (संगावार) यांनी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास शिस्तभंगविषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.
३. बदली झालेल्या ठिकाणी रुजू होईपर्यंतच्या कालावधीत डॉ. श्रीरामवार विजया शंकरराव (संगावार) यांना कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येणार नाही.
४. सदर बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी प्रभावीपणे होणे गरजेचे असल्यामुळे डॉ. श्रीरामवार विजया शंकरराव (संगावार) यांच्या कार्यमुक्ततेच्या दिनाकांपर्यंत अथवा जास्तीत जास्त दिनांक ३१/०७/२०१५ पर्यंतचे वेतन शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती येथे काढावे. त्यानंतरचे वेतन कोणत्याही परिस्थितीत शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती येथून काढण्यात येऊ नये. सदर वेतन शासकीय विज्ञान संस्था, नागपूर येथून काढावे. दिनांक ०१/०८/२०१५ पासुनचे वेतन शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती येथून काढण्यात आल्यास त्या महाविद्यालय/संस्थेतील आंहरण व संवितरण अधिकारी यांना व्यक्तीशः जबाबदार धरण्यात येईल.

५. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. डॉ. श्रीरामवार विजया शंकरराव (संगावार) कार्यमुक्त होऊन बदलीच्या ठिकाणी रुजू झाल्याबाबतचा अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दिनांक ०१.०८.२०१५ पुर्वी शासनास सादर करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२२१४३५३८८२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Niwrutti B Marale

Digitally signed by Niwrutti B Marale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Niwrutti B Marale
Date: 2015.07.23 10:53:34 +05'30'

**नि.भा.मराळे**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण
३. सर्व प्राचार्य, शासकीय महाविद्यालये/संस्था
४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर
६. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
७. डॉ. श्रीरामवार विजया शंकरराव (संगावार)
८. निवड नस्ती.

**प्रत** :- १. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव